## गृह विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ३० मे २०००

## आदेश

**मुंबई पोलीस अधिनियम, १९५१.**

क्रमांक आरटीआर. ०३२०००/सीआर-१४७/पोल-५(अ).—मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ (१९५१ चा मुंबई २२) च्या कलम ५(ब) आणि त्या अनुषंगाने प्रदान करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून आणि या संदर्भात अस्तित्वात असलेले संबंधित सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश अधिक्रमित करून याद्वारे महाराष्ट्र शासन महाराष्ट्र राज्यातील गृह विभागाच्या अखत्यारीतील पोलीस दलातील "पोलीस शिपाई" या पदाच्या सेवा भरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहे, जसे :—

१. या नियमांना "पोलीस शिपाई" (सेवा प्रवेश) नियम, २००० असे संबोधण्यात यावे.

२. या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) "विभाग" म्हणजे शासनाचा गृह विभाग ;

(ब) "पोलीस महासंचालक" म्हणजे पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, मुंबई ;

(क) "शासन" म्हणजे महाराष्ट्र शासन ;

(ड) "पोलीस दल" म्हणजे मुंबई पोलीस अधिनियम, १९५१ (१९५१ चा मुंबई २२) च्या कलम ३ अन्वये विहित करण्यात आलेले.

३. (१) पोलीस दलातील पोलीस शिपाई या पदावरील निवडीसाठी उमेदवारांकडे खालील शैक्षणिक व शारीरिक पात्रता असणे आवश्यक आहे :—

(अ) **शैक्षणिक अर्हता.**—महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळे अधिनियम, १९६५ (सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम ४१) अन्वये प्रस्थापित केलेल्या विभागीय मंडळाकडून घेण्यात येणारी उच्च माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा अथवा शासनाने या परीक्षेस समकक्ष म्हणून घोषित केलेली परीक्षा उत्तीर्ण असणे आवश्यक आहे. परंतु नक्षलग्रस्त भागात किमान शैक्षणिक पात्रतेचे पुरेसे उमेदवार मिळत नसतील तर माध्यमिक शाळा प्रमाणपत्र (एस.एस.सी.) उत्तीर्ण झालेले उमेदवार देखील घेता येतील.

(ब) **शारीरिक पात्रता—**

| | | महिला | पुरुष |
|---|---|---|---|
| (एक) किमान उंची | .. | १५५ सें. मी. | १६५ सें. मी. |
| (दोन) छाती | .. | .. | न फुगवता ७९ सें. मी. फुगवून ८४ सें. मी. |
| (तीन) वजन | .. | ४८ कि. ग्रॅ. | .. |

20020705141240000-0200

परंतु असे की, बँड पथकाच्या भरतीसाठी आलेल्या उमेदवारांना शारीरिक पात्रतेच्या वरील उप विभाग एक व दोन येथील अटींमध्ये खालीलप्रमाणे सवलत देण्याचे अधिकार पोलीस महासंचालक यांना राहतील :—

(१) उंची .. २.५ सें. मी.

(२) छाती न फुगविता .. २ सें. मी.

(३) छाती फुगवून .. १.५ सें. मी.

(क) वय—

कमीतकमी १८ वर्षे कमाल जास्त २५ वर्षे.

(मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत शासनाने वेळोवेळी ठरविलेल्या धोरणानुसार सूट देय राहील.)

३. (२) उमेदवारांची वैद्यकीय तपासणी प्राधिकृत शासकीय वैद्यकीय अधिकाऱ्याकडून प्रमाणित करण्यात येईल.

४. (१) (अ) जे उमेदवार विहित शारीरिक व शैक्षणिक पात्रता पूर्ण करीत असतील त्यांना १०० गुणांची शारीरिक पात्रता परीक्षा द्यावी लागेल. ही शारीरिक चाचणी खालील-प्रमाणे एकूण १०० गुणांची राहील :—

(१) १०० मिटर्स धावणे .. १० गुण

(२) लांब उडी .. १० गुण

(३) उंच उडी .. १० गुण

(४) गोळा फेक .. १० गुण

(५) ८०० मीटर्स धावणे .. २० गुण

(६) आम्स्टॅकल कोर्स .. २० गुण

(७) पुल अप्स (१०) .. १० गुण

(८) दोरावर चढणे .. १० गुण

एकूण .. १०० गुण

ही परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी उमेदवाराला किमान ५० गुण मिळविणे आवश्यक राहील.

(ब) जे उमेदवार शारीरिक पात्रता परीक्षा उत्तीर्ण होतील त्यांना ८० गुणांची लेखी चाचणी द्यावी लागेल, त्यामध्ये खालील विषयांचा समावेश असेल :—

(१) चालू घडामोडी (२) सामान्यज्ञान

(३) अंकगणित (४) निबंध लेखन.

2002070514126000010-0200

ही परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी किमान ४० टक्के गुण मिळविणे आवश्यक राहील.

(क) जे उमेदवार लेखी चाचणी उत्तीर्ण होतील त्यांना २० गुणांची मुलाखत चाचणी द्यावी लागेल. त्यामध्ये खालील बाबींचा समावेश असेल :—

(१) उमेदवाराचे सर्वसाधारण व्यक्तिमत्व

(२) क्रीडा, एन.सी.सी. अथवा तत्सम कार्यक्षमता

(३) इतर विशेष कार्यक्षमता उदा. संगणकाचे ज्ञान, ड्रायव्हिंगचे अथवा अन्य तांत्रिक विषयावरील प्रशिक्षण/उच्च शिक्षण

(२) वरील निकषांच्या आधारे चाचणी मंडळ उमेदवाराची पात्रता ठरविल.

५. महाराष्ट्र राज्याच्या पोलीस दलातील पोलीस शिपाई या पदावरील भरतीसाठी संबंधित सेवायोजन कार्यालय किंवा समाज कल्याण अधिकारी किंवा जिल्हा सैनिक बोर्ड किंवा आदिवासी विकास विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या केंद्रांच्या संबंधित कार्यालयाकडून उमेदवारांची नावे मागविण्यात येतील व त्यांच्यामधून उमेदवारांची निवड करण्यात येईल.—

परंतु असे की, खालील प्रवर्गातील उमेदवारांचा पोलीस भरतीसाठी थेट विचार करण्यात येईल. त्यांना सेवायोजन कार्यालयाच्या अथवा वर नमूद इतर संस्थांच्या कॉलची आवश्यकता असणार नाही. मात्र त्यांचे नाव संबंधित सेवायोजन कार्यालयात नोंदविलेले असणे आवश्यक राहील. तसेच त्यांचा संबंधित परिक्षेत्रातील जिल्ह्यातच भरतीसाठी विचार करता येईल.

(अ) पोलीस शिपाई ते सहाय्यक उप निरीक्षक दर्जापर्यंतच्या पोलिसांच्या फक्त एकाच मुलास किंवा मुलीस.

(ब) बॅन्ड पथकासाठी भरती करताना संगीतात पुरस्कार प्राप्त झालेली व्यक्ती.

(क) स्वातंत्र्य सैनिक अथवा माजी सैनिक या प्रवर्गातील उमेदवार मात्र त्यांना जिल्हाधिकाऱ्यांचे विहित प्रमाणपत्र सादर करावे लागेल.

(ड) शासनाने जाहीर केलेल्या नक्षलवादी क्षेत्रातील, नक्षलवाद्यांकडून हत्या झालेल्या पोलीस कर्मचारी, पोलीस पाटील व पोलीस खबरे यांच्या एका मुलास किंवा मुलीस.

६. (१) पोलीस शिपाई पदावरील भरतीसाठी एकूण उपलब्ध पदांच्या १० टक्के पदे पोलीस शिपाई भरतीसाठीची शारीरिक पात्रता पूर्ण करणाऱ्या व लेखी परिक्षा उत्तीर्ण झालेल्या खालील नमूद खेळाडूंमधून शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या निदेशानुसार थेट भरण्यात येतील :—

(अ) या भरतीसाठी आलेल्या उमेदवारांपैकी शारीरिक व लेखी परीक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांपैकी जे उमेदवार खालील खेळांपैकी किमान एखादा खेळ जिल्हा स्तरावरून विभागीय स्तरावर किंवा विभागीय स्तरावरुन राज्यस्तरावर किंवा राज्य स्तरावरून राष्ट्रीय स्तरावर खेळलेले असतील असे उमेदवार.

२००२०७०५१४१२४०००-०२००

खेळांचे प्रकार

| | |
|---|---|
| (१) ॲथलेटिक्स, | (२) ॲक्वेटिक्स (पाण्यातील खेळ), |
| (३) आर्चरी (धनुर्विद्या), | (४) बॅडमिंटन, |
| (५) बास्केटबॉल | (६) बॉक्सिंग |
| (७) बॉडी बिल्डिंग | (८) क्रिकेट |
| (९) फूटबॉल | (१०) जिम्नॅस्टिक्स |
| (११) हॅन्डबॉल | (१२) हॉकी |
| (१३) ज्युडो | (१४) कराटे |
| (१५) कबड्डी | (१६) खो-खो |
| (१७) कॅनोईंग-कयाकिंग (होडी वल्हविणे) | (१८) मल्लखांब |
| | (१९) पॉवर लिफ्टिंग |
| (२०) कुस्ती | (२१) व्हॉलिबॉल |
| (२२) वेटलिफ्टिंग | (२३) शूटिंग |

(ब) विशेष नैपुण्य मिळविलेले पुरुष व महिला खेळाडू जे विद्यापीठांमधून राज्य स्तरावर खेळलेले असतील.

(क) जे क्रिकेट खेळाडू रणजी करंडक सामन्यात खेळले असतील व या पदांसाठीच्या शारीरिक पात्रतेच्या अटी पूर्ण करीत असतील.

(२) वर नमूद पुरुष व महिला खेळाडूंना किमान उंचीच्या अटीमध्ये २.५ सें. मी. इतकी सूट देय असेल.

(३) पुरुष व महिला खेळाडू असलेल्या उमेदवारांना सेवायोजन कार्यालय किंवा समाज कल्याण कार्यालय वगैरे ठिकाणी नाव नोंदविणे आवश्यक असणार नाही.

७. पोलीस दलातील जे पोलीस कर्मचारी किंवा असाध्य रोगामुळे किंवा अन्य कारणामुळे वैद्यकीय अधिकाऱ्याच्या प्रमाणपत्रानुसार ज्यांना वैद्यकीय कारणास्तव सेवानिवृत्त करण्यात आले आहे किंवा जे सेवेत असतांना मृत पावले आहेत, अशा कर्मचाऱ्यांच्या एकाच मुलास किंवा मुलीस पोलीस भरतीसाठी बोलविण्यात येईल. तसेच त्यांना शारिरीक मोजमापात खालील सवलती देय असतील. :—

| | महिला | पुरुष |
|---|---|---|
| (१) उंची | .. २.५ सें. मी. | २.५ सें. मी. |
| (२) छाती | .. .. | न फुगवता २ सें.मी.<br>फुगवून १.५ सें. मी. |

८. धरणग्रस्त व प्रकल्पग्रस्तांसाठी संबंधित जिल्ह्यातील भरतीसाठी ५ टक्के समांतर आरक्षण उपलब्ध असेल. तसेच, अशा प्रकल्पग्रस्तांसाठी कमाल वयोमर्यादेत ३ वर्षांची सूट देय राहील. प्रकल्पग्रस्ताला कोणत्याही जिल्ह्यात भरतीसाठी अर्ज करण्याची परवानगी असेल व अशा व्यक्तीस सेवायोजन कार्यालयाकडून शिफारस होऊन येण्याची आवश्यकता असणार नाही.

200207051424000-0200

९. पोलीस शिपाई या पदावर नेमणूक झालेल्या व्यक्तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर विभागीय परिक्षा आणि हिंदी व मराठी भाषा परिक्षा त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

१०. पोलीस शिपाई या पदावर नियुक्त केलेली व्यक्ति महाराष्ट्र राज्यात कोठेही बदली होण्यास पात्र राहील.

११. पोलीस शिपाई या पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारास या पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण पुर्ण करावे लागेल व संबंधीत परिक्षा दोन संधीमध्ये उत्तीर्ण व्हावे लागेल. जर दोन संधीमध्ये तो परिक्षा उत्तीर्ण झाला नाही तर त्याची सेवा समाप्त करण्यात येईल.

१२. पोलीस शिपाई या पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांना, मुंबई पोलीस अधिनियम १९५६, मुंबई पोलीस (शिस्त व अपिल) नियम १९५९ व राज्य शासनाने वेळोवेळी विहित केलेले अन्य नियम लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि. शं. घुमाळे,
शासनाचे उप सचिव.

## HOME DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, Dated the 30th May 2000

### Order

BOMBAY POLICE ACT, 1951.

No. RTR-032000/CR-147/POL-5(A).—In exercise of the powers conferred by clause (*b*) of section 5 of the Bombay Police Act, 1951 (Bom. XXII of 1951), and of all other powers enabling it in this behalf, and in supersession of all the existing rules, orders and notifications made in this behalf, the Government of Maharashtra hereby makes the following rules for regulating recruitment to the post of Police Constables in the Police Force under the Home Department of the Government of Maharashtra, namely :—

1. These rules may be called the Police Constables (Recruitment) Rules, 2000.

2. In these rules, unless the context require otherwise :—

(a) " Department " means the Home Department of the Government ;

(b) " Director General " means the Director General and Inspector General of Police, Maharashtra State, Mumbai ;

(c) " Government " means the Government of Maharashtra ;

(d) " Police Force " means the Police Force constsituted under section 3 of the Bombay Police Act, 1951 (Bom. XXII of 1951).

2002070514124000-0200

3. (1) A candidate for selection to the post of Police Constable in the Police Force shall be required to possess minimum educational qualifications and physical standards, as follows namely :—

(a) *Educational Qualification.*—Passed the Higher Secondary School Certificate Examination conducted by a Divisional Board under the Maharashtra Secondary and Higher Secondary Education Boards Act, 1965 (Mah. XLI of 1965) and includes any other examinations declared by Government to be equivalent thereto. Provided that if adequate number of candidates are not available in the naxalite area then the candidate having passed S.S.C. could also be recruited.

(*b*) *Physical Standard.*—

| | Female | Male |
|---|---|---|
| (*i*) Height .. | shall not be less than 155 centimeters. | shall not be less than 165 centimeters. |
| (*ii*) Chest .. | .... | 79 centimeters on deflated, 84 centimeters on expanded |
| (*iii*) Weight | 48 Kgs. | .... |

Provided that, the Director General and Inspector of Police may relax physical standard prescribed in sub-clauses (*i*) and (*ii*) above in favour of candidates appeared for the recruitment for the Police Band Party to the extent as set out below :—

| | | |
|---|---|---|
| (1) Height | .. | 2.5 centimeters |
| (2) Chest deflated | .. | 2 centimeters |
| (3) Chest expanded | .. | 1.5 centimeters |

(*C*) *Age*—

Minimum 18 years. Maximum 25 years.

(Maximum age limit in respect of Backward Class candidates will be relaxable as per Government Policy from time to time).

(2) The medical fitness shall be certified by a Government Medical Officer authorised in this behalf.

4. (1)(*a*) The candidates who fulfill the physical standard and educational qualifications shall be required to appear for the physical fitness test of 100 marks. The physical test will be of total 100 marks as follows, namely :—

| | | |
|---|---|---|
| (1) 100 meters running | .. | 10 marks |
| (2) High jump | .. | 10 marks |
| (3) Long jump | .. | 10 marks |
| (4) Shot put | .. | 10 marks |
| (5) 800 meters running | .. | 20 marks |
| (6) Armstackle course | .. | 20 marks |
| (7) Pull ups (10) | .. | 10 marks |
| (8) Rope climbing | .. | 10 marks. |

2002070514124000-0200

A candidate is required to secure 50 marks for passing this examination.

*(h)* The candidates who pass the physical fitness test shall be required to appear for written test of 80 marks which will include the following subjects, namely :—

(I) Current Affairs,

(2) General Knowledge.

(3) Arithmetic,

(4) Essay Writing.

A candidate is required to secure not less than 40 per cent marks for passing this examination.

(c) The candidates who pass the written test shall be required to appear for the following oral tests of 20 marks namely :—

(I) General Personality of the candidate.

(2) Sports, N.C.C. or equivalent activities.

(3) Other special performance e.g. knowledge of Computer operating or equivalent technical training or higher education.

(2) On the basis of above criterion the Interview Board shall decide the fitntss of the Candidates.

5. Appointment to the post cf Police Constables in the Police Force of Maharashtra State shall be made from amongst the candidates called from the Employment Exchange or Social Welfare Office or District Military Board or Training Centres conducted by the Tribal Development Department of the respective unit :

Provided that, the candidates from the following categories, may be directly considered for recruitment without call letters of any Employment Exchange or other bodies as mentioned above, however, the said candidates are required to register their names in the concerned Employment Exchange or other bodies in the State, and they will be considered only in the Districts of concerned Range namely :—

(*a*) only one son or daugther of police officials from the rank of Police Constable to the rank of Assistant Sub-Inspector :

(*b*) candidates having earned an Award in the music for recruitment in the Police Band Party ;

(c) candidates from th category of Freedom Fighter or Ex-Servicemen who shall be required to submit a prescribed certificate obtained from the concerned Collector of the District ;

(*d*) Only son or daughter of the policemen, police patil or informant who has been killed in scuffle with Naxalites, in Naxalite Area notified by the Government.

6. (1) Out of the total posts available for Police Constable recruitment *ten* per cent posts shall be filled in as per Government directions, issued from time to time, directly from amongst the following categories of Sportsman

2002070514124000-0200

who have pased the written test and fulfilled required physical standard, namely—

(a) Sportmen and sportswomen who have played one of the following games at least from at the district level to divisional level, or divisional level to State level or State level to National level.

*Types and Names of games*

(1) Athletics
(2) Acquatics
(3) Archery
(4) Badminton
(5) Basketball
(6) Boxing
(7) Body Building
(8) Cricket
(9) Football
(10) Gymnastic
(11) Handball
(12) Hockey
(13) Judo
(14) Karate
(15) Kabbadi
(16) Kho-Kho
(17) Kanoing-Kayaking
(18) Malla-khamb
(19) Power-Lifting
(20) Wrestle
(21) Volleyball
(22) Weight lifting
(23) Yatching;

(b) The colour holder sportsmen and sportswomen who have played from University at the State level;

(c) The Cricket players who have played Ranji Trophy Tournament and fulfill the physical measurement (height and chest) required for the post;

6. (2) The relaxation in the required heigt by 2.5 centimeters, shall be given to the sportsmen and sportswomen mentioned above.

6. (3) The candidates rom sportsmen and sportswomen are not reqvired to register their names in the Employment Exchanage or Social Welfare Office, etc.

7. One son or daughter of a policemen who has been missing or has been retired on compassionate groung on the basis of medical certificate due to ill health, of so, or has been died while in service, may be called for the police recruirtment and he or she may get the following relaxation in respect of the physical standard, namely :—

| | Female | Male |
|---|---|---|
| (1) Height | 2.5 centimeters | 2.5 centimeters |
| (2) Chest | .... | 2 centimeters deflated<br>1.5 centimeters expanded. |

8. Five per cent, parallel reservation shall be available to project affected candidates for the recruitment. The project affected person can apply in any district and they need not require recommendation of the Employment Exchange etc., Similarly maximum age limit is relaxable by three years, in respect of recruitment for such project affected candidates.

2002070514124000-0200

. 9. A person appointed to the post shall berequired to pass examinations in Hindi and Marathi according to the rules made in that behalf, unless he has already passed, or has been exempted from passing those examinations.

10. A person appointed to the post shall be liable for transfer anywhere in the State of Maharashtra.

11. A candidate appointed to the post shall be required to complete the training prescribed for the post and have to pass concerned examinations within two chances. If he could not pass the said examination within two chances, his service shall be terminated.

12. The candidates appointed to the post ot Police Constable will be governed by Bombay Police Manual, 1956, Bombay Police (Discipline and Appeal) Rules, 1959 and similar other rules prescribed by Government from time to time.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**S. S. DHUMALE,**
Deputy Secretary to Government.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.
2002070514124000-0200